**विशेष केंद्रीय सहाय्य योजना अंतर्गत मंजुर "Comprehensive Dental Treatment For Students Of Ashram Schools" ही योजना राबविण्याकरिता योजनेच्या मार्गदर्शक सूचनांना मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आविवि-२०२४/प्र.क्र. ९१ /का-१९**
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: २७/०६/२०२४

<u>संदर्भ-</u>

१. जनजाती कार्य मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. F.No.११०१५/०१(१४)/२०१९-TSP, दि.२५.०२.२०२०
२. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.केंद्रीय-२०१९/प्र.क्र.६३/का-१९ दि. ०५.०८.२०१९
३. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्रमांक-विकेस-२०१९/प्र.क्र. २३/का.०८(५) ६२३५, दि.०७.०९.२०२३

<u>प्रस्तावना-</u>

केंद्र शासनाकडून दरवर्षी विशेष केंद्रीय सहाय्य अंतर्गत भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) व आदिम जमाती विकास कार्यक्रम या योजनांतर्गत राज्य शासनास अनुदान प्राप्त होत असते. या योजनांतर्गत प्राप्त होणाऱ्या अनुदानासाठी प्राप्त झालेल्या प्रस्तावांची सविस्तर छाननी करून निवडक प्रस्ताव केंद्र शासनाकडे सादर करण्यात आले. सदर प्रस्तावात Comprehensive Dental Treatment for Students of Ashram Schools या योजनेचा समावेश होता. सदर योजना मुख्यत्वे आदिवासी विकास विभागाच्या कार्यक्षेत्रात असणाऱ्या ए.आ.वि. प्रकल्प, शहापूर व पेण कार्यालयांच्या अधिनस्त असलेल्या शासकीय आश्रमशाळांमध्ये राबविणे प्रस्तावित आहे. शासकीय आश्रमशाळेतील सर्व विद्यार्थी/विद्यार्थिनी यांची तपासणी करुन त्यांच्या दंत आरोग्यात सुधारणा करणे व हास्य सौंदर्य वाढविणे महत्त्वाचे आहे. परंतु आदिवासी विकास विभागामार्फ़त चालविण्यात येणाऱ्या आश्रमशाळा ग्रामीण व दुर्गम भागात असल्या कारणाने तेथे शिक्षण घेत असलेल्या विद्यार्थी/विद्यार्थिनी यांना दात व हिरड्यांच्या विकारांना नेहमीच सामोरे जावे लागते. त्यानुषंगाने प्रकल्प कार्यालय शहापूर व पेण यांचे अधिनस्त असलेल्या शासकीय आश्रमशाळेतील विद्यार्थी/विद्यार्थीनी यांना दातांची समस्या निर्माण होऊ नये, तसेच विद्यार्थ्यांना दंत व मौखिक आरोग्य राखण्यासाठी मार्गदर्शन करणे व दंत आरोग्य बाबतच्या समस्यांबाबत जागरुक करण्यास्तव शासकीय आश्रमशाळांना प्रोस्ताहित करण्यासाठी आदिवासी विकास विभागाने ही योजना केंद्र शासनाकडे प्रस्तावित केली. जनजाती कार्य मंत्रालयाने दिनांक २१ फ़ेब्रुवारी २०२० रोजी आयोजित केलेल्या Project Appraisal Committee (PAC ) च्या बैठकीमध्ये Comprehensive Dental Treatment For Students Of Ashram Schools या योजनेस विशेष केंद्रीय सहाय्य योजने अंतर्गत रु. ५०.०० लक्ष इतक्या रकमेच्या प्रस्तावास मंजूरी दिल्याचे संदर्भाधीन पत्र क्र. १ अन्वये कळविले असून सदर निधी संदर्भाधीन क्र. २ च्या शासन निर्णयान्वये आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना वितरित करण्यात आला आहे.

२.  उक्त नमूद बाबींच्या अनुषंगाने Comprehensive Dental Treatment for Students of Ashram Schools ही रु. ५०.०० लक्ष इतक्या किंमतीची योजना राबविण्याबाबतच्या मार्गदर्शक सूचनांना मंजूरी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय-**

Comprehensive Dental Treatment for Students of Ashram Schools ही योजना आदिवासी विकास विभाग यांच्यामार्फत राबविण्यासाठी एकूण रु. ५०.०० लक्ष किंमतीच्या मार्गदर्शक सूचनांना या निर्णयाद्वारे सोबत जोडलेल्या परिशिष्ट क्रमांक १ नुसार मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२.  सदर योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार वितरीत तरतुदींच्या मर्यादेत योजना राबविण्याबाबत त्वरित कार्यवाही आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी करावी व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

३.  हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६२७१२१००११६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SACHIN SHRIPATI KHANDEKAR

Digitally signed by SACHIN SHRIPATI KHANDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBALDEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=22255a34cff0713981179442f0ceb1132d8d35bdb843b1f7aaab4ab21c1c5154, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=752F5B5CA7204855AC124E7354BAF19407343EA2B436448745D6FC6F481AF2BA, cn=SACHIN SHRIPATI KHANDEKAR
Date: 2024.06.27 12:21:02 +05'30'

**( स.श्री.खांडेकर )**
**कार्यासन अधिकारी ,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई
२) सचिव,आदिवासी विकास, यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई
३) आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक.
४) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
५) सर्व उपसचिव,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
६) सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास.
७) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,पेण व शहापूर
८) निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई

**परिशिष्ट-१**

**विशेष केंद्रीय सहाय्य अंतर्गत मंजूर योजना**

| | | |
|---|---|---|
| १. | योजनेचे नांव | **शासकीय आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांसाठी सर्वसमावेशक दंत उपचार** |
| २. | योजना मंजूरी वर्ष | सन २०१९-२० |
| ३. | उपलब्ध निधी | रु. ५०.०० लक्ष |
| ४. | योजनेतील लाभार्थी /युनिट संख्या | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, शहापूर व पेण अंतर्गत शासकीय आश्रमशाळांतील विद्यार्थी व विद्यार्थिनी |
| ५. | नियंत्रक अधिकारी | अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे |
| ७. | योजना राबविणारी यंत्रणा | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, शहापूर, पेण व स्वयंसेवी संस्था |
| ८. | योजनेचा उद्देश | शासकीय आश्रमशाळेतील सर्व विद्यार्थी /विद्यार्थिनी यांची दंत तपासणी करून त्यावर उपचार करणे व त्यांचे आरोग्य व हास्य सौंदर्य वाढविणे या उद्देशाने ही योजना महत्त्वाची आहे. त्याचप्रमाणे विद्यार्थ्यांना दातांचे व मौखिक आरोग्य राखण्यासाठी मार्गदर्शन करणे, त्यांना दंत व मौखिक आरोग्य बाबतच्या समस्यांबाबत जागृत करणे तसेच दंत तपासणी करतांना दातांचे विकार आढळल्यास त्यावर उपचार करणे हा या योजनेचा हेतू आहे.<br>१. प्रकल्प कार्यालय शहापूर व पेण यांचे अधिनस्त असलेल्या शासकीय आश्रमशाळेतील विद्यार्थी/विद्यार्थिनींना दातांची समस्या निर्माण होऊ नये. तसेच दंत तपासणी करताना दातांचे विकार आढळल्यास त्यावर उपचार करणे हा या योजनेचा हेतू आहे.<br>२.सध्या दातांचे आणि हिरड्यांचे विकार मोठ्या प्रमाणावर झाले असल्याने त्यांची योग्य पद्धतीने निगा राखणे आवश्यक आहे.<br>३.शासकीय आश्रमशाळा ह्या मुख्यत: आदिवासी भागात असल्याने तेथे शिक्षण घेत असलेल्या विद्यार्थ्यांना दात व हिरड्यांच्या विकारांना नेहमीच सामोरे जावे लागते.<br>४. आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना दाताला कशा प्रकारे ब्रश करावे याबाबत माहिती नसल्याने त्यांचे दात पिवळसर पडतात व दात किडतात. दात किडल्यामुळे अनेक समस्या उद्भवू शकतात. त्याच्यावर वेळेत उपचार केले नाहीत तर दात खराब होवून त्याचा आरोग्यावर परिणाम होत असतो.<br>५. अन्न चावणे व शब्द उच्चारण्यामध्ये दात हे महत्वाची भूमिका पार पडतात. तसेच सुंदर निरोगी दात मानवी सौंदर्यातही भर घालतात.<br>६. दातांची तपासणी केल्याने विद्यार्थ्यांमध्ये विकार उद्भवणार नाही. दातांची निगा योग्य प्रकारे राखता येईल. |
| ९. | योजना राबविण्याची कार्यपद्धती | सदर योजना प्राथम्याने शासकीय यंत्रणेमार्फत राबविण्यात यावी. जर शासकीय विभागाने सदर योजना राबविण्यास असमर्थता दर्शविल्यास त्यांच्याकडून ना हरकत दाखला प्राप्त करून दंत क्षेत्राशी निगडीत संस्थेची निवड उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय दि. ०१.१२.२०१६ अन्वये विहीत पद्धतीने निविदा प्रक्रिया राबवून करण्यात येईल. त्यासाठी खालील बाबी विचारात घेण्यात येतील.<br>अ. संस्था नोंदणीकृत असणे अनिवार्य राहील.<br>ब. संस्थेकडे प्रकल्प राबविणेकरिता प्रशिक्षित व तांत्रिक ज्ञान असलेला पुरेसा कर्मचारी वर्ग असावा आणि दंत क्षेत्रातील कार्याचा किमान ५ वर्षाचा अनुभव असावा. |

| | | |
|---|---|---|
| | | क. संस्था आर्थिकदृष्ट्या सक्षम असणे आवश्यक आहे.<br>ड. संस्थेने मागील तीन वर्षांचे लेखापरीक्षण करून त्याचा अहवाल सादर करणे आवश्यक आहे.<br>इ. नामांकित स्वयंसेवी संस्थेची निवड केल्यास प्रकल्प अधिकारी यांनी रु.१००/- च्या मुद्रांक पेपरवर योजना राबविणेबाबत अटी व शर्ती मान्य असल्याबाबतचा करारनामा करावा.<br>नामांकित संस्थेमार्फ़त योजनेचे काम करावयाचे झाल्यास संस्थेस आगाऊ अनुदान न देता त्यांच्या कामाची प्रगती पाहून त्यांना खालील टप्प्या टप्प्याने अनुदान अदा करण्यात येईल.<br>१. आदेश निर्गमित झाल्यानंतर संस्थेने करारनामा सादर केल्यावर २०% अनुदान अदा करण्यात यावे.<br>२. योजना राबविणाऱ्या संस्थेने तपासणी केलेल्या विद्यार्थ्यांची यादी सादर केल्यानंतर व दंत विकार असलेल्या विद्यार्थ्यांची यादी सादर केल्यानंतर व संबंधित आश्रमशाळेतील मुख्याध्यापक यांचा अहवाल व प्रकल्प कार्यालयातील सहायक प्रकल्प अधिकारी, आदिवासी विकास निरीक्षक यांचा अहवाल प्राप्त झाल्यानंतर ४०% अनुदान संस्थेस अदा करण्यात यावे.<br>३. दंत विकार असलेल्या विद्यार्थ्यांचा पूर्णपणे उपचार करण्यात आल्यानंतर व तसा अहवाल आश्रमशाळेतील मुख्याध्यापक व आदिवासी विकास निरीक्षक यांचेकडून प्रकल्प कार्यालयास प्राप्त झाल्यानंतर उर्वरित ४०% अनुदान अदा करण्यात यावे.<br>प्रकल्प कार्यालयाच्या स्तरावर सदर योजनेची अंमलबजावणी करणेकामी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.<br><br>अ.क्र. — पदनाम — पद<br>१. — प्रकल्प अधिकारी, ए.आ.वि.प्रकल्प — अध्यक्ष<br>२. — सहायक प्रकल्प अधिकारी (शिक्षण),ए.आ.वि.प्रकल्प — सदस्य<br>३. — लेखा अधिकारी,ए.आ.वि.प्रकल्प — सदस्य<br>४. — तालुका आरोग्य अधिकारी,संबंधित तालुका — सदस्य<br>५. — ज्येष्ठतम मुख्याध्यापक, शास. आश्रमशाळा — सदस्य<br>६. — आदिवासी विकास निरीक्षक, ए.आ.वि.प्रकल्प — सदस्य<br>७. — सहायक प्रकल्प अधिकारी (विकास) — सदस्य सचिव<br><br>सदर समिती योजनेच्या अनुषंगाने निर्णय घेणारी सर्वोच्च समिती असेल. आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांनी दंत तपासणीकरिता संस्थेची/डॉक्टरांची निवड करणे, दंत तपासणी व उपचाराची कार्यपद्धती ठरविणे हे समितीचे मुख्य कार्य असेल. |
| १०. | योजनेचे संनियंत्रण, मूल्यमापन व पर्यवेक्षण | योजनेचे संनियंत्रण व मूल्यमापन करण्याची कार्यपध्दती उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय दि. १ डिसेंबर २०१६ नुसार करण्यात येईल.<br>१.सदर दंत विकार झालेल्या विद्यार्थ्यांचा अहवाल प्रकल्प कार्यालयातील सहायक प्रकल्प अधिकारी, आदिवासी विकास निरीक्षक यांचे संयुक्त पथकाकडून करण्यात येऊन त्याचा सविस्तर अहवाल प्रकल्प कार्यालयास सादर करतील.<br>२.सदर प्रकल्पांची छायाचित्रांसह यशोगाथा तयार करण्यात येईल. तसेच प्रकल्पाविषयी सर्व माहिती उदा. प्रकल्प अंमलबजावणीचे फ़ोटो, यशोगाथा, विद्यार्थी |

| | | |
|---|---|---|
| | | माहितीचा डेटाबेस इ. बाबतची माहिती संबंधित प्रकल्प अधिकारी कार्यालयाकडून अभिलेखात जतन करण्यात येईल.<br>संबंधित प्रकल्प अधिकारी कार्यालयाकडून सदर योजनेचा निधी खर्च झाल्यानंतर योजनेचे उपयोगिता प्रमाणपत्र, आर्थिक व भौतिक अहवाल विहीत मार्गाने शासनास सादर करण्यात येईल. |
| ११ | योजनेचा कालावधी | १ वर्ष |
| १२ | योजनेच्या अटी व शर्ती | १. लाभार्थी हा अनुसूचित जमातीतील असावा.<br>२. तो आश्रमशाळेत शिक्षण घेत असलेला असावा.<br>३. योजना राबविणाऱ्या यंत्रणेस /संस्थेस दंत तपासणी केल्यानंतर दंत विकार आढळलेल्या विद्यार्थ्यांचे दंतविकारानुसार साधारण व गंभीर आजार असे वर्गीकरण करणे आवश्यक आहे.<br>४. संबंधित योजना राबविणाऱ्या यंत्रणेस/संस्थेस दंत तपासणीत दंत विकार आढळून आलेल्या विद्यार्थ्याचे/विद्यार्थिनीचे पूर्ण उपचार करणे बंधनकारक आहे. कोणत्याही परिस्थितीत ते अर्धवट सोडल्यास त्याबाबत संबंधितावर कार्यवाही करता येईल.<br>५. योजना राबवित असतांना संबंधित यंत्रणेकडून प्रगती अहवाल व ऑनलाईन दंततपासणीचा डेटाबेस तयार करून तो प्रकल्प कार्यालयास सादर करण्यात यावा.<br>६. विद्यार्थ्यांची दंत तपासणी प्रत्यक्षात आश्रमशाळेमध्ये जाऊन करणे बंधनकारक आहे. कोणत्याही परिस्थितीत त्यांची तपासणी इतर ठिकाणी करण्यात येऊ नये.<br>७. सदर योजना यशस्वीपणे राबविल्यानंतर योजनेचे उपयोगिता प्रमाणपत्र विहीत मार्गाने सादर करण्याची जबाबदारी प्रकल्प अधिकारी यांची राहील.<br>८. सदर योजनेच्या लक्षांक, योजना अंमलबजावणीच्या कार्यपद्धतीत आवश्यक ते बदल करण्याचे अधिकार संबंधित अपर आयुक्त,आदिवासी विकास यांना राहतील.<br>९. सदर योजनेंतर्गत लाभ दिलेल्या लाभार्थ्यांच्या याद्या तालुक्याच्या ठिकाणी पंचायत समिती, तहसील कार्यालय व आदिवासी विकास विभागाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्याची कार्यवाही प्रकल्प अधिकारी यांनी करावी. |